**राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान**
**राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या उपसमितीची**
**पुनर्रचना करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०१८/प्र.क्र.१२७/२०१८/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, शिक्षण व युवक सेवा विभाग क्रमांक-एलआयबी-२५७५/७९५६/(७०५)/तेरा, दिनांक २९.७.१९७७
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.मराग्रं-२५२४/प्र.क्र.३६/२०१५/साशि-५, दिनांक ३०.०३.२०१५
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.मराग्रं-२५२४/प्र.क्र.३६/२०१५/(२)/ साशि-५, दि.३०.०३.२०१५
४) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र, जा.क्र.३१/SLPL बैठक/२०१८-१९/५२९२, दि.२२.०६.२०१८

**<u>प्रस्तावना :</u>**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कलकत्ता या संस्थेची स्थापना भारत सरकारच्या आर्थिक सहाय्याने १९७२ साली झाली. देशातील सार्वजनिक ग्रंथालय सेवेचा सार्वत्रिक विकास करणे, हे प्रतिष्ठानचे उद्दिष्ट आहे. राज्यांमध्ये व संघराज्यांमध्ये ग्रंथालय सेवा प्रभावीपणे राबवून ती वृद्धिंगत करण्यासाठी प्रतिष्ठान, राज्यांना ५०:५० या प्रमाणात अनुरुप अनुदान देते. प्रतिष्ठानच्या या योजना राबविण्यासाठी राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या "सर्वांसाठी पुस्तके" (Books for all) या पुस्तकामधील मार्गदर्शक तत्त्वांनुसार शासन निर्णय दिनांक २९ जुलै, १९७७ अन्वये राज्य ग्रंथालय नियोजन समितीची स्थापना करण्यात आली. प्रतिष्ठानच्या **'ग्रंथ भेट'** या योजनेंतर्गत ग्रंथ खरेदी करुन, त्याचे वितरण निवडक सार्वजनिक ग्रंथालयांना करण्यात येते. मराठी भाषेत प्रतिवर्षी प्रकाशित झालेले सर्व ग्रंथ, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या विचारार्थ ठेवण्यात येतात. या सर्व ग्रंथांतून निवडक ग्रंथांची निवड करण्याचे काम सुलभपणे पार पाडण्यासाठी, राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या उपसमितीची संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये पुनर्रचना करण्यात आली. त्यानुसार सदर समितीची मुदत दिनांक २९.०३.२०१८ रोजी संपुष्टात आलेली आहे. त्यानुषंगाने राज्य ग्रंथालय समितीच्या उपसमितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानअंतर्गत राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या उपसमितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे-

| | | |
|---|---|---|
| १. | ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान यांच्या अध्यक्षांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | अध्यक्ष वा कार्यवाह, महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ | सदस्य |
| ४. | उपसचिव (ग्रंथालये), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५. | शासन नियुक्त सदस्य, श्री. विनय मावळणकर. | सदस्य |
| ६. | ग्रंथपाल (गट-अ) राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, ग्रंथालय संचालनालय,मुंबई. | निमंत्रक तथा सदस्य सचिव |

२. सदर उपसमितीची मुदत सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तीन वर्षांपुरती मर्यादित राहील. ग्रंथालय संचालकांनी विहित पद्धतीनुसार समान निधी योजनेतून शासन मान्य सार्वजनिक ग्रंथालयासाठी ग्रंथ भेट योजनेचा लाभ देण्यासाठी प्रतिष्ठानाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार ग्रंथ निवड करणे तसेच ग्रंथ खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव नियमानुसार तपासून उपसमितीस पुरेशा वेळेपूर्वी सादर करणे बंधनकारक राहील.

३. समितीच्या अशासकीय सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिक भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ मार्च, २०१० मधील नियमानुसार मंजूर करण्याबाबतची कार्यवाही, संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचेकडून करण्यात येईल आणि याकरीता होणारा खर्च, "मागणी क्र.डब्ल्यू-४,२२०५ कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये,(०१) ग्रंथालय संचालनालय, (०१)(०१) ग्रंथालय संचालनालय, अनिवार्य (२२०५ ०२५१), ११ देशांतर्गत प्रवास खर्च ", या लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११०३१४५७४९३९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatraya
Rambhau Kahar

Digitally signed by Dattatraya Rambhau Kahar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc29789a0057acb8ed170e1748553c17db300239c347be5264afbff5eb51fcac, cn=Dattatraya Rambhau Kahar
Date: 2018.11.03 15:01:04 +05'30'

**( द.रा कहार )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
२. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. उपसचिव (ग्रंथालये), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. उपसमितीचे सर्व सदस्य (ग्रंथालय संचालनालयामार्फ़त)
६. ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१०. अध्यक्ष, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता, (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
११. महासंचालक, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता, (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
१२. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
१३. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१४. निवडनस्ती (साशि-५)